नक्षल हल्ल्यात मृत पावलेल्या नागरिकांच्या वारसांना मदत देण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आरएलएफ-२०२१/प्र.क्र.१९२/म-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १७ नोव्हेंबर, २०२१

**वाचा** :-
१) केंद्र शासनाचे पत्र क्र. ११०४४/११/२०१ व्हीटीव्ही,दि.२९.०६.२०१२
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक:- एनएएक्स १२१२/प्र.क्र.५०१/वि.शा.१ ब, दि.२१.०४.२०१४
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-२०१४/प्र.क्र.२८०/म- ३,दि.३१.१०.२०१४
४) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्रमाक. कार्या-३/अ.का.-टंचाई/सं.क्र./कावि/२४९/२०२०, दि.०९.१२.२०२०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने त्यांचे पत्र क्र.११०४४/११/२०११ व्हीटीव्ही, दिनांक २९.०६.२०१२ अन्वये Central Scheme for Assistance to Civilian Victims of Terrorist/Communal/Naxal violence या योजनेच्या अंमलबजावणीबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार नक्षलग्रस्त हल्ल्यात बळी पडलेल्या मृतव्यक्तींच्या वारसांना केंद्रीय निधीतून रू.३.०० लक्ष मदत देण्याकरिता संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली. तद्नंतर संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये नक्षल हल्ल्यात बळी पडलेल्या मृतकांच्या वारसांना देण्यात येणाऱ्या मदतीच्या रक्कमेत वाढ करून रू. ५.०० लक्ष एवढी करण्यात आली आहे.

दि.२१.०४.२०१४ च्या शासन निर्णयानुसार व गृह विभागाच्या दि.१७.०६.२०१४ रोजीच्या पत्रानुसार जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी नक्षली हल्लयात मृत पावलेल्या नागरीकांच्या कुटूंबियांना केंद्र शासनाकडून मिळणारी आर्थिक मदत देण्यासंबंधाने जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दि.०३.०९.२०२० च्या बैठकीमध्ये ११ प्रस्ताव मंजूर केले आहेत. सदर ११ प्रस्तावांकरीता निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याप्रकरणी सर्व बाबी विचारात घेऊन नक्षल हल्ल्यात मृत पावलेल्या सामान्य नागरीकांच्या वारसांना आर्थिक मदत देण्याचा शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी संदर्भाधीन क्र.४ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार नक्षल हल्ल्यात मृत पावलेल्या सामान्य नागरीकांच्या वारसांना मदत करण्याकरिता “मागणी क्र.सी-५, प्रधान लेखाशीर्ष-२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००-इतर कार्यक्रम, (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, (०१(०६) नक्षलवादी हल्लयात झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य, (केंद्रीचे अनुदान) (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ बी ३७२) (दत्तमत) " या लेखाशीर्षांतर्गत सन २०२१-२० या आर्थिक वर्षासाठी रू.९.८० लक्ष इतक्या निधीची तरतूद करण्यात आली होती. सद्य:स्थितीमध्ये सदर लेखाशीर्षाखाली रू.१.८० इतका निधी शिल्लक आहे. सबब,नक्षल हल्ल्यात मृत पावलेल्या सामान्य नागरीकांच्या वारसांना मदत करण्याकरिता या शासन निर्णयान्वये रू.५५,००,०००/- (रूपये पंचावन्न लक्ष फक्त) एवढी रक्कम उणे प्राधिकारात वितरीत करण्यास जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना या एकच प्रकरणी प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मदतीची रक्कम थेट लाभार्थीच्या बॅक खात्यामध्ये हस्तांतरीत करावी.

२. वरील घटनेतील मृत व्यक्तिंच्या वारसदारांना अदा करावयाची रक्कम विभागीय आयुक्त,नागपूर यांच्यामार्फत उपलब्ध करून देण्यात येत आहे.

३. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन पत्रानुसार सदर मदत बाधितांच्या वारसांना देण्याची तात्काळ कार्यवाही करावी. तसेच केंद्र शासनाकडून सदर रक्कमेची प्रतिपूर्ती करण्याबाबत केंद्र शासनाच्या दि.२९.०६.२०१२ च्या ज्ञापनामध्ये देण्यात आलेल्या सूचनेनुसार जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी तात्काळ कार्यवाही करावी.

४ सदर प्रकरणी खर्चाचे पत्रक विहित कालमर्यादेत न चुकता महसूल व वन विभागास प्राप्त होईल याची संबंधित विभागीय आयुक्त तसेच जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच प्रचलित नियमानुसार मदतीचे वाटप करण्यात यावे.

५. नियंत्रक अधिकारी यांना असेही कळविण्यात येते की, सदर मदतीची रक्कम विनाविलंब वितरीत करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही यांची दक्षता घ्यावी. अनुदान वाटपासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ पाठविण्यात यावे. याबाबतचा खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावेत.

६. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८६/२०२१/व्यय-९, दि.२८.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२१११७१७३६१४९२१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.11.17 17:40:54 +05'30'

**( संजय औ. धारूरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त नागपूर
२) जिल्हाधिकारी, गडचिरोली
३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
५) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली,
७) संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई,
८) कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प-१/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली
१०) निवडनस्ती (म-३ कार्यासन).